वितरण आदेश क्र.३
सन २०१४-१५

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
या संस्थेस सहाय्यक अनुदान २०१४-२०१५
(योजनेतर) (तिसरा हप्ता)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यशदा २०१४/प्र.क्र.१०८/१४/१२ अ**

हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१५.

**संदर्भ:**
१. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी२०१४/प्र.क्र. ९१ /२०१४/२५, दि.९ एप्रिल २०१४
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय सम क्रमांक दि.१५.०५.२०१४
३. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज २०१४/प्र. क्र.११०/अर्थसंकल्प ३, दि.१ जुलै २०१४.
४. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी-२०१४/प्र.क्र. ९१/२०१४/२५, दि. ३ जुलै, २०१४
५. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज २०१३/प्र. क्र.८५/अर्थसंकल्प ३,दि.२ जानेवारी, २०१५, दि. ९ फेब्रुवारी,२०१५
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय सम क्रमांक दि. ७.०२.२०१५
७. सामान्य प्रशासन विभाग,शासन पत्र क्र.आरईएस-२०१५/प्र.क्र.८३/२०१५,२५, दि.२३ मार्च,२०१५

**शासन निर्णय :-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेच्या २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या योजनेतर खर्चासाठी संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये **रु.६,००,००,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी फक्त)** इतकी तरतूद केली असून, त्यापैकी **रु. २,००,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी फक्त)** एवढे लेखा अनुदान **एप्रिल ते जुलै, २०१४** या चार महिन्यांकरिता योजनेतर खर्चासाठी मंजूर करण्यात आले होते. आता संदर्भाधीन क्रमांक ४ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेला संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये, वरील लेखा अनुदानातून एप्रिल ते जुलै, २०१४ या चार महिन्यांकरिता योजनेतर खर्चासाठी (प्रशिक्षण शुल्क) **रु.२,००,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी फक्त )** इतके सहाय्यक अनुदान (पहिला हप्ता ) व संदर्भाधीन क्रमांक ६ च्या शासन निर्णयान्वये, ऑगस्ट २०१४ ते फेब्रुवारी २०१५ या आठ महिन्यांकरिता योजनेतर खर्चासाठी (प्रशिक्षण शुल्क) **रु. २,८०,००,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी, ऐंशी लाख फक्त)** इतके सहायक अनुदान (दुसरा हप्ता) असे एकूण **रूपये ४,८०,००,०००/-(अक्षरी रूपये चार कोटी, ऐंशी लाख फक्त)** इतके सहायक अनुदान म्हणून मंजूर करण्यात आले आहे.

३. आता संस्थेस सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र. ७ च्या पत्रानुसार एकूण अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार संपूर्ण तरतूद, सुधारित अंदाज म्हणून वेतनेतर खर्चासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आली आहे. त्या अनुषंगाने योजनेतर खर्चासाठी (प्रशिक्षण शुल्क) उर्वरित निधी **रु. १,२०,००,०००/-(अक्षरी रुपये एक कोटी, वीस लाख फक्त )** इतके सहायक अनुदान (तिसरा हप्ता) म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

४. हा खर्च **"मागणी क्र .ए-४, मुख्य लेखाशिर्ष २०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण (००) (०६) -यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यास सहाय्यक अनुदान (योजनेतर) (२०७००५३२) -३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)"** याखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

६. संस्थेने आर्थिक वर्ष २०१४-२०१५ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

७. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई व शासनाला तातडीने सादर करावे.

८. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९. यशदा, पुणे या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी **(कोड क्र.२२०१०००१२१)** यांनी संस्थेस वितरीत करण्यात येत असलेल्या सहायक अनुदानाची रक्कम **रु.१,२०,००,०००/- ( अक्षरी रुपये एक कोटी,वीस लाख फक्त )** आहरित करावी.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या,संदर्भाधीन क्र.५ च्या परिपत्रकांन्वये व सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.७ च्या शासन पत्रातील आदेशान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१५०३३११६५२२७९३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PATIL PRATIBHA MADHAV

Digitally signed by PATIL PRATIBHA MADHAV
DN: CN = PATIL PRATIBHA MADHAV, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD,CID - 916982
Date: 2015.03.31 17:08:11 +05'30'

**( प्रतिभा मा. पाटील )**
**कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२. मा.अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.

३. महासंचालक, यशदा, पुणे,राजभवन आवार,बाणेर रोड,पुणे.
४. लेखाधिकारी, यशदा, पुणे. (२ जादा प्रतींसह).
५. सह संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा) , मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. उप कोषागार कार्यालय, पुणे.
८. वित्त विभाग (व्यय-४ / अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र.२५, मुंबई - ३२.
११. निवड नस्ती.